केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आदिवासी उपयोजनेतून सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून २२१०E४५५ या लेखाशिर्षातून ४०% राज्य हिश्श्यातील Kind Grant चे रु.४९९.११ लक्ष इतके राज्य हिश्श्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी -१३२३/प्र.क्र.२७३/आरोग्य-७**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : ५ मार्च, २०२४

वाचा :-

१) भारत सरकार, वित्त मंत्रालय, नवी दिल्ली यांचे मंजूरी आदेश दिनांक ३०/१०/२०२३, १९/१२/२०२३ व ३०/१२/२०२३
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२. ०४. २०२३.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.४६/ अर्थ-३, दिनांक ०५. १२. २०२३.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०८.१२. २०२३.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.पुरक-२०२३/प्र.क्र.९४/अर्थ-३, दिनांक १९.१२. २०२३
६) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.राआसोम/एफएमजी/Kind राहि/१२६८४७-८५२/२०२३-२४ दिनांक २३/०१/२०२४
७) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०५.०२.२०२४

प्रस्तावना:-

ग्रामीण जनतेस सहजसाहय, परवडयाजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल, २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले आहे. सदर योजनेअंतर्गत प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम (Reproductive Child Health), नियमित लसीकरण, मिशन प्लेक्सीपुल, पायाभूत सुविधांचे बळकटीकरण व पल्स पोलिओ लसीकरण इत्यादी आरोग्य सेवा देण्यात येतात. त्या अनुषंगाने राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रम करीता आदिवासी उपयोजनेतून सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून ४०% राज्य हिश्श्याचे अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. प्रस्तुत प्रकरणी आता पर्यंत वितरीत करण्यात आलेल्या अनुदानाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | तपशील | रक्कम (लाखात) |
|---|---|---|
| १. | अर्थसंकल्पीय तरतुद (मुळ) | १००००.०० |
| २. | हिवाळी अधिवेशनात अर्थसंकल्पीत तरतुद | ३०८५.०० |
| A | एकुण तरतूद | १३०८५.०० |
| | शासन निर्णयानुसार प्राप्त अनुदान | |
| १ | बियुडी-१३२३/प्र.क्र.२२७/आरोग्य-७ दि. २० जून, २०२३ | ७६.१५ |
| २ | बियुडी-१३२३/प्र.क्र.२७१/आरोग्य-७ दि. २० जून, २०२३ | ८२१.१९ |
| ३ | बियुडी-१३२३/प्र.क्र.२७३/आरोग्य-७ दि. ११ जुलै, २०२३ | २६०२.०० |
| ४ | बियुडी-१३२३/प्र.क्र.२७३/आरोग्य-७ दि. २५ सप्टेंबर २०२३ | ११३७.७८ |
| ५ | बियुडी-१३२३/प्र.क्र.२७३/आरोग्य-७ दि. ३० ऑक्टोंबर २०२३ | २६०२.०० |
| B | एकुण शासन निर्णयानुसार प्राप्त अनुदान | ७२३९.१२ |
| १ | बीयुडी-१३२३/प्र.क्र.२७३/आरोग्य-७ दिनांक ०२/०१/२०२४ | ७१७.६४ |
| २ | बीयुडी-१३२३/प्र.क्र.६४२/आरोग्य-७ दिनांक ०२/०१/२०२४ | १७७४.६७ |
| C | एकुण प्राप्त अनुदान | २४९२.३१ |
| D | उपलब्ध तरतुद एकुण (A-B-C) | ३३५३.५७ |

**<u>शासन निर्णय :-</u>**

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमाकरीता आदिवासी उपयोजनेतून (TSP) Kind Grant साठी सन २०२३-२४ मधील ४०% राज्य हिश्श्यातील रक्कम वितरीत करण्यास आदिवासी विकास विभाग व वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. दरम्यानच्या कालावधीमध्ये संदर्भ (क्र.४) येथील वित्त विभागाच्या दिनांक ०८/१२/२०२३ च्या शासन परिपत्रकान्वये केंद्र पुरस्कृत योजनांसाठी करण्यात आलेली मुळ अर्थसंकल्पीय तरतुद व पुरवणी मागणीद्वारे करण्यात आलेली अर्थसंकल्पीय तरतुद केंद्र हिस्सा व समरुप राज्य हिस्सा सर्व मंत्रालयीन विभागानां बीम्स प्रणालीवर १०० टक्के वितरित केलेला असल्याने सदर परिपत्रकांती सुचनांचे पालन करुन निधी आहरित करण्याची कार्यवाही करण्याबाबत वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे. सदर वित्त विभागाच्या परिपत्रकातील मान्यतेच्या अनुषंगाने राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत आदिवासी उपयोजनेकरिता Kind Grant साठी लेखाशिर्ष २२१०E४५५ अंतर्गत राज्य हिश्श्याची रु.४९९.११ लक्ष इतकी रक्कम राज्य आरोग्य सोसायटीस वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च लेखाशिर्ष २२१०E४५५ अंतर्गत सन २०२३-२४ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखविण्यात यावा.

०३. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटीच्या यांच्याकडे सूपुर्द करावी. यासाठी सहसंचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर प्रस्तावावरील खर्च खालीलप्रमाणे नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२३-२४ साठी मंजूर करण्यात आलेल्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

| अ. क्र. | तपशिल | (रु.लाखात) | | |
|---|---|---|---|---|
| | | लेखाशिर्ष | सन २०२३-२४ ची अर्थसंकल्पीय तरतूद | मागणी रक्कम (राज्य ४०% ) |
| १ | आदिवासी विकास विभाग मागणी क्र. टी - ५,<br>२२१० - वैद्यकिय सेवा व सार्वजनिक आरोग्य,<br>०६, सार्वजनिक आरोग्य विभाग<br>७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१, जनजाती क्षेत्र उपयोजना,<br>(०१) (१६) राष्ट्रीय ग्रामिण आरोग्य अभियान-राज्य आरोग्य संस्थांना सहायक अनुदान (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) ,<br>३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२१०E४५५ | १३०८५.०० | ४९९.११ |

०५. तसेच सदर निधीच्या विनियोगाबाबत व त्यावरील संनियंत्रण व प्रगती अहवालाच्या अनुषंगाने केंद्र शासनाच्या संदर्भ क्र १ मधील पत्रान्वये दिलेल्या निर्देशाचे पालन करणे बंधनकारक राहील.

०६. वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

०७. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखा परिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप नसल्याचे राज्य आरोग्य सोसायटीने प्रमाणित केलेले आहे.

०८. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी परिच्छेद-४ मधील संस्थामार्फत पुरवठादाराच्या/लाभार्थ्याच्या खात्यात थेट जमा होणार आहे.

०९. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तीचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

१०. सदर अनुदान सशर्त असून या पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे प्रमाणपत्र सादर केले आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

११. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक २४.०६.२०२१ व दिनांक १४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे/ अटी व शर्तीचे पालन करुन त्यासंदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात योणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

१२. सदर प्रस्तावावरील निधीच्या विनियोगाच्या अनुषंगाने आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीच्या संदर्भात शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकारी यांची प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

१३. सदर शासन निर्णय, केंद्र शासनाचे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक मुंविनि/-२०२२/प्र.क्र.-२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून तसेच वित्त विभागाच्या दि.०८.१२.२०२३ रोजीच्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०५१४४००३२४१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA VITTHAL KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2024.03.06 15:04:56 +05'30'

(राजेंद्र वि. कुडले )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग ( अर्थसंकल्प/व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मुंबई
११. निवडनस्ती ( आरोग्य -७) .